महाराष्ट्र विकास सेवा गट-अ मधील
अधिकाऱ्यांच्या बदल्या / नियुक्त्या.

**महाराष्ट्र शासन**
**ग्राम विकास विभाग**
**शासन आदेश क्रमांकः मविसे-१०१४/प्र.क्र.२९६/२०१४/आस्था-३**
बांधकाम भवन, २५ मर्झबान पथ, मुंबई- ४०० ००१.
तारीख : १८ फेब्रुवारी, २०१५.

**संदर्भ-**

शासन आदेश, ग्राम विकास व जलसंधारण विभाग, क्र. मविसे-१०१४/प्र.क्र.२९६/२०१४/ आस्था-३,दिनांक २८ जानेवारी, २०१५.

**शासन आदेश :-**

सार्वजनिक सेवेच्या हितार्थ महाराष्ट्र शासकीय कर्मचाऱ्यांच्या बदल्यांचे विनियमन आणि शासकीय कर्तव्ये पार पाडताना होणाऱ्या विलंबास प्रतिबंध अधिनियम, २००५ मधील कलम ४ (४) मधील तरतूदींनुसार सक्षम प्राधिकाऱ्याच्या पूर्वमान्यतेने या विभागातील श्री.ए.एच. पवार, तत्कालिन गट विकास अधिकारी, पंचायत समिती कराड, जि.सातारा यांची संदर्भाधीन दिनांक २८.१.२०१५ च्या आदेशान्वये गट विकास अधिकारी, पंचायत समिती लांजा, जि.रत्नागिरी या पदावर करण्यात आलेल्या बदलीमध्ये या आदेशान्वये अंशत: बदल करुन; श्री.ए.एच. पवार यांची पदस्थापना गट विकास अधिकारी, पंचायत समिती कागल, जि.कोल्हापूर या रिक्त पदावर करण्यात येत आहे.

२. श्री.ए.एच. पवार यांनी त्यांच्या नवीन पदाचा पदभार त्वरीत स्वीकारावा. तसेच त्यांनी अनधिकृत रजेवर जाऊ नये. त्यांचे लक्ष सामान्य प्रशासन विभागाच्या क्रमांक: सीडीआर १०८२/ २५६७/२८/अकरा, दिनांक ३०.८.१९८२ च्या परिपत्रकाकडे वेधण्यात येत आहे. त्यात दिलेल्या सूचना

लक्षात घेऊन बदली रद्द करण्यासाठी कुठल्याही स्वरुपाची आवेदने सादर केल्यास, ते शिस्तभंगाच्या कारवाईस पात्र ठरतील याची त्यांनी नोंद घ्यावी.

३. श्री.ए.एच. पवार यांनी नवीन नियुक्तीच्या ठिकाणी हजर व्हावे व पदभार स्वीकारल्याचा दिनांक शासनास कळवावा.

सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५०२१८१३१३१९१७२० असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Sarita Rishi Bandekar-Deshmukh

Digitally signed by Sarita Rishi Bandekar-Deshmukh
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Under Secretary, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Sarita Rishi Bandekar-Deshmukh
Date: 2015.02.18 14:04:51 +05'30'

( सरिता बांदेकर-देशमुख )
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

प्रत,

१. विभागीय आयुक्त, पुणे / कोकण.
२. मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, सातारा /रत्नागिरी / कोल्हापूर.
३. महालेखापाल-१ (लेखा परीक्षा / लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र, मुंबई.
४. मा.मंत्री (ग्राम विकास) यांचे खाजगी सचिव
५. मा.राज्यमंत्री (ग्राम विकास) यांचे खाजगी सचिव
६. मा.प्रधान सचिव (ग्राम विकास व पंचायत राज) यांचे स्वीय सहायक.
७. श्री.ए.एच. पवार, तत्कालिन गट विकास अधिकारी, पंचायत समिती कराड, जि.सातारा. (मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, सातारा यांचेमार्फत)
८. कार्यासन, आस्था-२, ग्राम विकास व जलसंधारण विभाग
९. निवड नस्ती (कार्यासन, आस्था-३), ग्राम विकास व जलसंधारण विभाग